राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाच्या शिफारशीनुसार मृत न्यायाधीन बंदी श्री.रवी पांडुरंग पाटील यांच्या अवलंबितांना रु.२,५०,०००/- (रुपये दोन लक्ष पन्नास हजार फक्त) एवढया रकमेची आर्थिक मदत मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक-एमआयएस-०१९९/१४/५९/पीआरएस-२.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- ५ ऑक्टोंबर १९९९.

वाचा:- सहाय्यक प्रबंधक (विधी) राष्ट्रीय मानवी हक्क आयोग (विधी विभाग) ,नवी दिल्ली यांचे

इंग्रजी पत्र क्रमांक-४७/१३/९७-९८ दिनांक ९.६.९९.

**शासन निर्णय:-** न्यायाधीन बंदी श्री.रवी पांडुरंग पाटील हे कल्याण कारागृहात दिनांक २२.४.९७ रोजी दाखल झाले व कारागृह इस्पितळाच्या शिफारशीवरुन त्यांना उल्हासनगर सेंट्रल हॉस्पिटलमध्ये दाखल करण्यांत आले व ते दिनांक २५.४.९७ रोजी उल्हासनगर सेंट्रल हॉस्पिटलमध्ये मृत्यू पावले. शवविच्छेदन अहवालावरुन न्यायाधीन बंद्याचा मृत्यू अनेक बाहय जखमांच्या धक्क्यामुळे झाला असल्याचा निष्कर्ष निघतो. या प्रकरणी सदर कैद्याचा मृत्यू हा "कारागृह अधिका-यांकडून अत्याचारापासून बंद्याचे संरक्षण करणे व त्याच्या कारागृहात जगण्याच्या हक्काचे उल्लंघन होणार नाही, याची खात्री करणे " याबाबत निष्काळजीपणा झाल्याचे राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाचे मत असल्याचे त्यांच्या अहवालावरुन दिसून येते व या संदर्भात राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाने अशी शिफारस केली आहे की, प्रस्तुत प्रकरणी मृत न्यायाधीन बंदी श्री.रवी पांडुरंग पाटील यांच्या कुटुंबाला रुपये २,५०,०००/- (रुपये दोन लक्ष पन्नास हजार फक्त) एवढया रकमेची नुकसान भरपाई ४ आठवडयाच्या आंत करण्यांत यावी त्यामुळे या प्रकरणी राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाच्या शिफारशीप्रमाणे मृत न्यायाधीन बंदी श्री.रवी पांडुरंग पाटील यांच्या अवलंबितांना रुपये २.५ लाख एवढी रक्कम आर्थिक मदत म्हणून तात्काळ अदा करणे आवश्यक आहे.

मृत न्यायाधीन बंदी श्री.रवी पांडुरंग पाटील यांच्या अवलंबितांना रुपये २,५०,०००/- (रुपये दोन लक्ष पन्नास हजार फक्त) एवढी रक्कम आकस्मिकता निधीतून अग्रीम म्हणून हया आदेशान्वये कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांच्या स्वाधीन करण्यांत येत आहे. ही रक्कम त्यांनी मृत न्यायाधीन बंदी श्री.रवी पांडुरंग पाटील यांच्या अवलंबितांस दिनांक ११ ऑक्टोबर १९९९ पूर्वी अदा करावी.

वरीलप्रमाणे रु.२,५०,०००/- (रुपये दोन लक्ष पन्नास हजार फक्त) एवढा येणारा खर्च मागणी क्रमांकबी-७,२०५६-तुरुंग-१०१(दोन) जिल्हा तुरुंग-२० इतर खर्च (२०५६०१६२) योजनेतर भारित या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व हा खर्च आकस्मिकता निधीतून मंजूर करण्यात आलेल्या अग्रीमातून भागविण्यांत यावा. आकस्मिकता निधी अग्रीमातून करावयाच्या खर्चासंबंधी देयके काढताना ८००००८११/संगणक संकेतांकाचा वापर करावा.

आकस्मिकता निधी अग्रिमाची प्रतिपूर्ती करण्यासाठी पूर्ण रकमेची पूरक मागणी आगामी अधिवेशनात रितसर सादर करण्यांत येईल.

नियंत्रक अधिका-यांना असेही कळविण्यांत येते की, त्यांनी आकस्मिकता निधी खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिका-याकडे रक्कम सुपूर्द करण्यासंबंधीच्या आदेशात आगाऊ रकमेतून खर्च करताना सादर करण्यांत येणा-या देयकावर "आकस्मिकता" निधी अग्रीम शासन निर्णय,वित्त विभाग,क्रमांक-आकनि-११९९/८१/अर्थसंकल्प-३ दिनांक १.१०.९९अन्वये मंजूर"असे लाल शाईने लिहावे अशी स्पष्ट सूचना अंतर्भूत करावी व ही सूचनाही लाल शाईने अधोरेखित करावी. तसेच आकस्मिकता निधीतून काढलेल्या अग्रीमातून करावयाच्या खर्चाबाबत महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिकेतील प्रकरण-१६ मध्ये विशद केलेल्या नियमांचे व वित्त विभाग परिपत्रक क्रमांक-सीएनएफ/सीएलएफ-१०८३/१४०/अर्थसंकल्प-३ दिनांक २६ एप्रिल १९८३ व परिपत्रक क्रमांक- सीएनएफ-१०८६/१५/अर्थसंकल्प-३ दिनांक २८.४.८६ अन्वये देण्यांत आलेल्या सूचनांचेही काटेकोरपणे पालन करण्यांत यावे. तसेच अग्रीमातून प्रत्यक्ष केलेल्या खर्चाची एकत्रित माहिती त्यांनी त्या महिन्यानंतर १५ तारखेपर्यंत वित्त विभाग (अर्थसंकल्प -३) मंत्रालय,मुंबई यांना पाठवावी व त्याची एक प्रत प्रधान सचिव(परिवहन) गृह विभाग यांचेकडे पाठविण्यांत यावी.

हा निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-सीआर-६९९/९९/कक्ष-८ दिनांक १९.८.९९ अन्वये निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

गु.ज.कुळकर्णी

( गु.ज.कुळकर्णी )
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,
कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) पुणे/पश्चिम विभाग, पुणे /मध्य विभाग, औरंगाबाद/ पूर्व विभाग,नागपूर/दक्षिण विभाग,मुंबई.
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
निवासी लेखा अधिकारी,मुंबई.
कोषागार अधिकारी,पुणे.
सहसंचालक,लेखा व कोषागारे,संगणक कक्ष,नवीन प्रशासन भवन,५ वा मजला,मुंबई. (दोन प्रती)

वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-३/१०)
गृह विभाग,बीयुडी-१.
निवडनस्ती.